**१५ व्या केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार Million Plus Cities अंतर्गत सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षातील पाणी पुरवठा व व्यवस्थापनात सुधारणा व प्रभावी घनकचरा व्यवस्थापन (For improving conservation, supply and management of water and efficient solid waste management measures) साठीचे अवितरीत अनुदान Non-Million Plus Cities यांना वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एफएफसी-२०२३/प्र.क्र.९२/ नवि-४**
मंत्रालय, मुंबई- ४०००३२
दिनांक :- १३ मार्च, २०२४

**वाचा :-**

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एफएफसी २०२०/प्र.क्र.५६/नवि-०४, दि.२८.१०.२०२० व दिनांक ३०.०४.२०२१.
२. नगर विकास विभाग, शासन पत्र समक्रमांक दिनांक २१.०२.२०२४.
३. केंद्र शासनाचे पत्र **(ULB Release No.119/2023-24)** क्रमांक F१५(४५)/FC-XV/FCD/ २०२०-२५, दिनांक ०७.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

२०२१-२२ ते २०२५-२६ या वर्षासाठी १५ वा वित्त आयोग गठीत झालेला असुन वाचा क्र.२ येथील दिनांक ०७.०३.२०२४ च्या आदेशान्वये १५ व्या वित्त आयोगाअंतर्गत Million Plus Cities गटाकरीता पाणी पुरवठा व व्यवस्थापनात सुधारणा व प्रभावी घनकचरा व्यवस्थापन (For improving conservation, supply and management of water and efficient solid waste management measures) यासाठी सन २०२२-२३ वर्षाचा अवितरीत अनुदान Non-Million Plus Cities गटातील पात्र नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाकरीता वितरीत करण्यास केंद्र शासनाने उपलब्ध केले आहे. सदर अनुदान राज्यातील संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

१५ व्या केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार केंद्र शासनाकडून वाचा क्र.२ येथील आदेशान्वये मुक्त करण्यात आलेला सन २०२२-२०२३ वर्षाच्या Million Plus Cities गटाकरीता पाणी पुरवठा व व्यवस्थापनात सुधारणा व प्रभावी घनकचरा व्यवस्थापन (For improving conservation, supply and management of water and efficient solid waste management measures) यासाठीचे अवितरीत रु.७.७० कोटी Non-Million Plus Cities गटातील पात्र महानगरपालिका, नगरपरिषदा व नगर पंचायतींना तसेच कटक मंडळांना केंद्र शासनाने विहित केलेल्या निकषा आधारे सोबतच्या परिशिष्टात दर्शविल्याप्रमाणे वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रु. ७.७० कोटी इतकी रक्कम, सोबतच्या परिशिष्टानुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना वितरित करण्यासाठी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी सोबतच्या परिशिष्टानुसार संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांच्या हिश्शाची रक्कम PFMS प्रणालीमार्फत तात्काळ वितरित करण्यात यावी.

३. सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाकडून प्राप्त झालेले सदर अनुदान पात्र नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानी १५ व्या वित्त आयोगाच्या **पिण्याचे पाणी ( पावसाच्या पाण्याची साठवण व पुर्नवापरासह ) व घनकचरा व्यवस्थापन** (a) drinking water (including rainwater harvesting and recycling) and (b) Solid Waste Management साठी बंधनकारक (Tied) अनुदान म्हणून खर्च करणे अनिवार्य आहे. सदर रकमेचे विहित नमुन्यातील विनियोग प्रमाणपत्र तात्काळ आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी शासनाकडे सादर करावे. सदर अनुदानातून खर्च करताना शासन निर्गमित करेल अशा शासन निर्णयातील तरतुदीनुसार तसेच वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार करणे बंधनकारक राहील. सदरचे अनुदान **"सशर्त"** म्हणून वितरीत करण्यात येत आहे.

४. १५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशी नुसार सन २०२२-२०२३ वर्षाचा Non-Million Plus Cities गटाकरिता प्राप्त झालेला वर्षाच्या **पिण्याचे पाणी (पावसाच्या पाण्याची साठवण व पुर्नवापरासह) व घनकचरा व्यवस्थापन** (a) drinking water (including rainwater harvesting and recycling) and (b) Solid Waste Management साठी बंधनकारक (Tied) अनुदान वर नमुद केल्याप्रमाणे पात्र महानगरपालिका, नगरपालिका व नगरपंचायती यांना तसेच कटक मंडळांना वितरीत करण्यांत येत असून सदरचा खर्च हा "मागणी क्र.एफ-२,२२१७ नगर विकास, ०५, इतर नगर विकास योजना,१९१,नागरी स्थानिक संस्था, नागरी विकास प्राधिकरण,नागरी विकास बोर्ड इत्यादींना सहाय्य,(००)(०३) पंधराव्या वित्त आयोगाच्या शिफारशींनुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना सहायक अनुदाने (अनिवार्य), (२२१७ A३१४) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) " या लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२०२४ या चालू वित्तीय वर्षाकरीता उपलब्ध असणाऱ्या तरतूदीमधून खर्ची घालण्यांत यावा.

५. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी उपायुक्त, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना नियंत्रक अधिकारी तसेच संबंधित सहायक आयुक्त (लेखा), नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदरहू शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारीक सं.क्र. १२/२०२४/विआक, दिनांक १२ मार्च, २०२४ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१२१४१७४६३६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA PARBAT DALVI

Digitally signed by MAHENDRA PARBAT DALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e687fdecf6e6c3d1891a03c3515e1681bedf82a21ad79ad6d0b6f7a911a1d3fc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8077AF9533C0322E769EE4FAB8AD782BC365A071F23E8951D686CCFEC4ED1244, cn=MAHENDRA PARBAT DALVI
Date: 2024.03.13 14:27:43 +05'30'

**( महेंद्र दळवी )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त व संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
५) महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) सर्व विभागीय आयुक्त
८) सर्व जिल्हाधिकारी
९) आयुक्त, संबंधीत महानगरपालिका
१०) मुख्याधिकारी, संबधित नगरपरिषदा/ नगरपंचायती
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित कटकमंडळे
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३) कक्ष अधिकारी (विआक), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) अपर मुख्य सचिव, नगर विकास-१ विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई
१५) प्रधान सचिव,नगर विकास-२, यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई
१६) निवडनस्ती, कार्यासन नवि-४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

शासन निर्णय क्रमांक :- एफएफसी-२०२३/प्र.क्र.९२/नवि-४ , दिनांक १३ मार्च,२०२४ सोबतचे परिशिष्ट.

| अ.क्र. | जिल्हा | म.न.पा. / न.पा. / न.पं./कटक मंडळाचे नाव | लोकसंख्या व क्षेत्रफळानुसार देय निधी (पूर्णांकात रुपये) |
|---|---|---|---|
| १ | ठाणे | अंबरनाथ नगरपरिषद | ६१,७०,३९७ |
| २ | छत्रपती संभाजीनगर | औरंगाबाद कटकमंडळ | ४,३९,४१९ |
| ३ | अमरावती | दर्यापूर नगरपरिषद | ८,८७,६२७ |
| ४ | पुणे | दौंड नगरपरिषद | १२,०३,७७२ |
| ५ | यवतमाळ | ढाणकी नगरपंचायत | ४,२०,३३४ |
| ६ | छत्रपती संभाजीनगर | गंगापूर नगरपरिषद | ६,७५,४०३ |
| ७ | बुलढाणा | जळगांव जामोद नगरपरिषद | ६,८८,३२९ |
| ८ | ठाणे | कुळगाव-बदलापूर नगरपालिका | ४२,४१,२२१ |
| ९ | यवतमाळ | महागाव नगरपंचायत | २,००,७८३ |
| १० | परभणी | मानवत नगरपरिषद | ७,९०,८६२ |
| ११ | बुलढाणा | मेहकर नगरपरिषद | ११,०१,४८२ |
| १२ | पुणे | पुणे कटकमंडळ | १७,४७,३८० |
| १३ | पुणे | राजगुरुनगर नगरपरिषद | ६,१२,१३४ |
| १४ | कोल्हापूर | शिरोळ नगरपरिषद | ६,७३,०६६ |
| १५ | ठाणे | ठाणे महागनरपालिका | ४,४८,२७,७३९ |
| १६ | ठाणे | उल्हासनगर महागनरपालिका | १,२३,२०,०५२ |
| | | **एकूण** | **७,७०,००,०००** |

MAHENDRA PARBAT DALVI

Digitally signed by MAHENDRA PARBAT DALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e687fdecf6e6c3d1891a03c3515e1681bedf82a21ad79ad6d0b6f7a911a1d3fc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8077AF9533C0322E769EE4FAB8AD782BC365A071F23E8951D686CCFEC4ED1244, cn=MAHENDRA PARBAT DALVI
Date: 2024.03.13 14:28:39 +05'30'

( महेंद्र दळवी )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन